# महाराष्ट्र शासन

क्रमांक : संकीर्ण०३२०/प्र.क्र.७०/१३-स
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
मंत्रालय विस्तार इमारत, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०००३२.
दिनांक : १६ सप्टेंबर,२०२१.

**वाचा**:- १. या विभागाचे आदेश क्र.ससंनि ०८१८/ प्र.क्र.८३/ १३स, दिनांक ०७/०९/२०१९.
२. या विभागाचे आदेश क्र.संसंनि ०८१८/ प्र.क्र.८३/१३स, दिनांक १४/०१/२०२०.
३. समक्रमांकाचे दिनांक ३१ जानेवारी, २०२०, दिनांक १८ मार्च, २०२०, दिनांक ३१ मे,२०२०, दिनांक १७ जून, २०२०, दिनांक २८ सप्टेंबर,२०२०, दिनांक १६ जानेवारी, २०२१, दिनांक ०२ फेब्रुवारी, २०२१, दिनांक २४ फेब्रुवारी, २०२१ व दिनांक ०६ एप्रिल, २०२१ रोजीचे आदेश.
४. राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे जा.क्र.रासनिप्रा/ कक्ष-११/ निवडणूक सुरू / आदेश /२७२९/ सन २०२१, दिनांक १३.०९.२०२१

## आदेश

ज्याअर्थी, जागतिक आरोग्य संघटनेने जगभर पसरलेला साथीचा रोग (Pandemic) म्हणून घोषित केलेला कोव्हीड-१९ (कोरोना विषाणु) देशात तसेच, महाराष्ट्रातही संक्रमित होत असल्याने, सार्वजनिक आरोग्य विभागाने राज्यात कोरोना विषाणुमुळे उद्भवणाऱ्या संसर्गजन्य आजारामुळे आरोग्यविषयक आपत्कालिन परिस्थिती नमूद करून, दिनांक १३.०३.२०२० रोजीच्या अधिसूचनेन्वये साथरोग अधिनियम-१९८७ च्या खंड २,३ व ४ ची अंमलबजावणी राज्यात सुरू केल्याने, महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६० चे कलम ७३ कक मधील “राज्य शासनाला कोणत्याही नैसर्गिक आपत्तीमध्ये जनहिताच्या दृष्टीने सहकारी संस्थांच्या निवडणूका पुढे ढकलण्याचा अधिकार असणे,” या तरतूदीनुसार जागतिक आरोग्य संघटनेने जगभर पसरलेला साथीचा रोग म्हणून घोषित केलेला कोरोना विषाणू (कोव्हीड-१९) आणि त्यामुळे, उद्भवलेल्या गंभीर परिस्थितीमुळे राज्यावर आलेली नैसर्गिक आपत्ती विचारात घेता, विषाणूचा संसर्ग टाळण्यासाठी राज्यातील सर्व सहकारी संस्थांच्या निवडणूका वेळोवेळी दिनांक १८ मार्च, २०२०, दिनांक १७ जून, २०२० व दिनांक २८ सप्टेंबर,२०२० रोजीच्या आदेशान्वये दिनांक ३१ डिसेंबर,२०२० पर्यंत तर, दिनांक १६ जानेवारी, २०२१, दिनांक २४ फेब्रुवारी, २०२१ व दिनांक ०६ एप्रिल, २०२१ रोजीच्या आदेशान्वये दिनांक ३१ ऑगस्ट, २०२१ पर्यंत पुढे ढकलण्यात आल्या होत्या.

ज्याअर्थी, राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरणावर महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६० चे कलम ७३ कब (१) मधील तरतुदीनुसार राज्यातील सर्व सहकारी संस्थांच्या निवडणूकीचे (२५० पेक्षा कमी सभासद संख्या असलेल्या सहकारी गृहनिर्माण संस्था वगळून) संचालन, पर्यवेक्षण व नियंत्रण करण्याची जबाबदारी सोपविलेली असणे.

ज्याअर्थी, महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६० चे कलम ७३ कब व महाराष्ट्र सहकारी संस्था (समितीची निवडणूक) नियम २०१४ चे नियम ३ (पाच), नियम ६ व नियम ९ अन्वये

प्राप्त अधिकारानुसार प्राधिकरण निवडणूकीकरीता तयार करण्यात आलेल्या "जिल्हा निवडणूक आराखड्यातील" प्रथम टप्प्यातील सहकारी संस्थांच्या निवडणूक प्रक्रिया (२५० व त्यापेक्षा कमी सभासद संख्या असलेल्या सहकारी गृहनिर्माण संस्था वगळून आणि निवडणूक प्रक्रिया सुरू असणाऱ्या जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँका वगळून) सुरू करण्याबाबत राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरणाने दिनांक १३ सप्टेंबर,२०२१ रोजी आदेश निर्गमित केले असणे.

ज्याअर्थी, २५० व त्यापेक्षा कमी सभासद संख्या असलेल्या सहकारी गृहनिर्माण संस्थांसाठी महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६० मध्ये नव्याने प्रकरण समाविष्ट केले असून, त्यामधील तरतूदीनुसार उक्त सहकारी गृहनिर्माण संस्थांच्या निवडणूका घेण्याची जबाबदारी संबंधित संस्थेची आहे. त्यामुळे, सदर सहकारी गृहनिर्माण संस्थांच्या निवडणूकीच्या स्थगितीचा कालावधी संपला असल्याने सदर निवडणूका तात्काळ सुरू करण्याची आवश्यकता आहे.

त्याअर्थी, २५० व त्यापेक्षा कमी सभासद संख्या असलेल्या सहकारी गृहनिर्माण संस्थांच्या निवडणूकांची प्रक्रिया सुरू करणे आवश्यक असल्याने, महाराष्ट्र सहकारी संस्था (समितीची निवडणूक) (सुधारणा) नियम २०१९ मधील नमूद तरतूदींचा अवलंब करून या आदेशापासून, २५० व त्यापेक्षा कमी सभासद संख्या असलेल्या सहकारी गृहनिर्माण संस्थांच्या निवडणूका तात्काळ सुरू करण्याची कार्यवाही करावी.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२१०९१७१११८३२५६०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Chaudhary Anil Jayaram

Digitally signed by Chaudhary Anil Jayaram
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-operation Marketing And Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f26cf80358fa3133e4d85ddac30ae54b06c63743fd5510dc0ebca082b6c483ce, serialNumber=d124ae9bbd15bed87dbd08ef779cf1b85a4020339eb1c2ef0e112fb67063011c, cn=Chaudhary Anil Jayaram
Date: 2021.09.17 11:19:40 +05'30'

**(अनिल ज. चौधरी)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.

२. विभागीय सहनिबंधक/ जिल्हा उपनिबंधक / उपनिबंधक, सहाय्यक निबंधक, सहकारी संस्था (सर्व)

३. निवडनस्ती, कार्यासन १३-स.

प्रत, माहितीस्तव

१. सचिव, राज्य सहकारी निवडणुक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे.